**जिल्हा परिषद, अहमदनगर यांना शाळांच्या नवीन वर्ग खोल्या बांधकामासाठी श्री. साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी यांच्याकडून पहिल्या टप्प्यातील रु.१० कोटी अर्थसहाय्य देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**विधि व न्याय विभाग**

**शासन निर्णय क्र. सासंवि -१०१८/८९३/प्र.क्र.८८/का.१६**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २६ जून, २०१८.

**संदर्भ:-**
१. शिक्षणाधिकारी, प्राथमिक, जिल्हा परिषद , अहमदनगर यांचे पत्र क्रमांक जा.क्र./कार्या-५/८९/२०१७ दिनांक २४.०५. २०१७
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी यांचे पत्र क्र. एसएसएसटी / वशी-लेखा-अनुदान/७१२/२०१८, दि.११.०५.२०१८

## प्रस्तावना :-

शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जिल्हा परिषद, अहमदनगर यांनी त्यांच्या संदर्भाधीन पत्र क्रमांक १ च्या दिनांक २४.०५.२०१७ रोजीच्या पत्रान्वये असे विनंती केली आहे की, अहमदनगर जिल्हा परिषदेच्या ३५९९ शाळा मधून सुमारे २,४२,००० विद्यार्थी शिक्षण घेत आहेत. विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक गुणवत्ता वाढीबरोबरच त्यांच्या शारिरिक, मानसिक व भावनिक विकास होण्याकरिता विविध उपक्रम जिल्हा परिषद शाळांमधून राबविले जातात. विद्यार्थ्यांचे व्यक्तीमत्व घडविण्यासाठी शाळांना पायाभूत सुविधा पुरविणे आवश्यक ठरते. या गरजा जिल्हा परिषद सेस व जिल्हा वार्षिक योजनांच्या उपलब्ध निधीतून पूर्ण करण्याचा प्रयत्न केला जात आहे. तथापि, शाळांची व वर्ग खोल्यांची संख्या विचारात घेता, निधी अपूरा पडत आहे. दरवर्षी नैसर्गिक आपत्तीमुळे शाळांचे खूप आर्थिक नुकसान होते. तेथेही निधी उपलब्ध करावा लागतो. तरी सन २०१६-१७ च्या डी.पी.आर. नुसार एका वर्ग खोलीला रुपये ७,२०,०००/- याप्रमाणे जिल्हा परिषद शाळांच्या ५०० वर्ग खोल्यां-साठी रुपये ३६.०० कोटी इतका निधी श्री साईबाबा संस्थानाकडून उपलब्ध करुन देण्याची विनंती करण्यात आलेली आहे.

२. मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक ०१.०२.२०१८ रोजी झालेल्या बैठकीत जिल्हा परिषद, अहमदनगर यांना शाळेंच्या नवीन वर्ग खोल्यांसाठी निधी उपलब्ध करुन द्यावा यासाठी जिल्हाधिकारी, अहमदगनर व मुख्य कार्यकारी अधिकारी यांची समिती गठित करावी. या समितीने निकष निश्चित करुन शाळांची यादी अंतिम करुन श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था (शिर्डी) या यादीप्रमाणे टप्प्याटप्प्यानुसार निधी उपलब्ध करुन द्यावा व शाळांच्या वर्ग खोल्यांचे बाधकाम, सार्वजनिक बांधकाम विभागाकडून करण्यात यावे, असा निर्णय झाला.

व्यवस्थापन समितीच्या दिनांक ०२.०५.२०१८ रोजीच्या सभेत जिल्हा परिषद, अहमदनगर प्राथमिक शाळांच्या वर्ग खोल्यांच्या बांधकामासाठी रुपये ३० कोटी अनुदान देण्यास तत्वत: मान्यता

देण्यात आली. सदरहू अनुदान टप्प्याटप्याने देण्यात यावे. पहिल्या टप्प्याची रुपये १० कोटी मात्र अनुदान देण्यात यावे. याकरिता जिल्हाधिकाऱ्यांच्या यादीतून शाळांची निवड स्थानिक उप समितीने करावी, असे ठरविण्यात आले. त्यानुसार मुख्य कार्यकारी अधिकारी श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था (शिर्डी) यांनी त्यांच्या संदर्भाधीन क्रमांक २ च्या दिनांक ११ मे,२०१८ रोजीच्या पत्रान्वये जिल्हा परिषद, अहमदनगर यांना रुपये १० कोटी अर्थसहाय्य देण्यास मान्यता द्यावी, अशी विनंती केलेली आहे. सदर विनंतीच्या अनुषंगाने जिल्हा परिषद, अहमदनगर येथील शाळांच्या नवीन खोल्यांचे बांधकाम करण्यासाठी श्री साईबाबा संस्थान शिर्डीमार्फत जिल्हा परिषद, अहमदनगर यांना अनुदान मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था (शिर्डी), अधिनियम २००४ मधील कलम १७ (२) (ण) मधील तरतुदीनुसार जिल्हा परिषद,अहमदनगर यांना शाळेच्या नवीन खोल्या बांधण्यासाठी पहिल्या टप्प्यात रुपये १० कोटी इतके अनुदान श्री साईबाबा संस्थानाद्वारे देण्यास खालील अटींच्या अधीन राहून मंजूरी देण्यात येत आहे.

१) उपरोक्त मंजूर निधी श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी यांचेमार्फत जिल्हा परिषद, अहमदनगर यांना उपलब्ध करुन देण्यात यावा.

२) जिल्हा परिषद, अहमदनगर यांच्या अखत्यारीतील शाळांचे बांधकाम सार्वजनिक बांधकाम विभाग, अहमदनगर यांचेमार्फत करण्यात यावे.

२) जिल्हा परिषद,अहमदनगर यांचेमार्फत कामाच्या प्रगतीप्रमाणे सार्वजनिक बांधकाम विभाग, अहमदनगर यांच्याकडे निधी वर्ग करण्यात यावा.

४) जिल्हाधिकारी, अहमदनगर यांनी सादर केलेल्या यादीतील शाळांची निवड श्री साईबाबा संस्थानाच्या स्थानिक समितीमार्फत करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८०६२६१६१६३८२२१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by Salunke
Sunita Parag
Date: 2018.06.26 16:22:15 +05'30'

**( सु.प. साळुंके )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-** १. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,

२. मा.राज्यमंत्री, विधि व न्याय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. अध्यक्ष, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी, जि.अहमदनगर,
४. मुख्य कार्यकारी अधिकारी,श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था,शिर्डी,अहमदनगर
६. मुख्याधिकारी, नगरपंचायत, शिर्डी,
७. निवड नस्ती/का.१६.